**महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (क), गट-ब, गट-अ, अ.कृ.अ. संवर्गात बदली / पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या पदावर तात्काळ हजर होणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक आकृवि-१२११/प्रक्र २१/१५ए**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ११ जानेवारी, २०११**

## परिपत्रक

विभागातील म.कृ.से. गट-अ, म.कृ.से.गट-ब, गट-ब(क), तसेच सामान्य राज्य सेवेतील गट-अ व गट-ब (प्रशासन अधिकारी/सहाय्यक प्रशासन अधिकारी) पदावर बदली/पदोन्नतीने पदस्थापना आदेश निर्गमित होवुनही शासनाच्या आदेशानुसार संबंधित अधिकारी/कर्मचारी दिर्घकाळ पदस्थापनेच्या पदावर हजर न होता बदली/पदस्थापना आदेश रद्द करण्यासाठी किंवा त्यामध्ये सुधारणा करुन इच्छित पदावर पदस्थापना करवून घेण्यासाठी विविध मार्गाने शासनावर दबाव आणण्याचा प्रयत्न करीत असतात. ही वस्तु:स्थिती अनेक प्रकरणांत शासनाच्या निदर्शनास आली आहे. त्यामुळे बऱ्याच कार्यालयातील पदे रिक्त राहून त्यांचा विभागाच्या एकूण कामकाजावर विपरित परिणाम होतो. सदर बाब कार्यालयीन शिस्तीस धरुन नाही. संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सदर कृतीची शासन स्तरावर गांभिर्याने दखल घेण्यात आली आहे.

उपरोक्त पार्श्वभूमीवर कृषि विभागातील सर्व अधिकारी/ कर्मचा-यांना पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

**शासन स्तरावरुन यापुर्वी किंवा वेळोवेळी निर्गमित झालेल्या / निर्गमित होणाऱ्या बदली / पदस्थापना आदेशानुसार १५ दिवसांत पदस्थापनेच्या/बदलीच्या पदावर हजर न झाल्यास सर्व संबंधित अधिकारी/ कर्मचा-यांवर तसेच शासनाच्या आदेशानुसार संबंधितांना पदस्थापनेच्या पदावर हजर होण्यासाठी वेळीच कार्यमुक्त न करणा-या संबंधित कार्यालय प्रमुखांविरोधात म.ना.से.( शिस्त व अपील) नियम १९७९ व म.ना.से. (वर्तणुक) नियम १९७९ मधील तरतुदीनुसार कोणतीही पुर्वसुचना न देता शिस्तभंगाची कार्यवाही सुरु करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.**

सही/-
**( संदिप ढाकणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
कृषि सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व विभागीय कृषि सह संचालक
यांना सूचित करण्यात येते की, सदर परिपत्रक आपल्या अधिनस्त असलेल्या सर्व अधिकारी कर्मचारी यांच्या तात्काळ निदर्शनास आणावे.
सर्व अधिक्षक कृषि अधिकारी
यांना सूचित करण्यात येते की, सदर परिपत्रक आपल्या अधिनस्त असलेल्या सर्व अधिकारी कर्मचारी यांच्या तात्काळ निदर्शनास आणावे.
कक्ष अधिकारी (१६अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती

**प्रतिलिपी,**

मा.मंत्री (कृषि)/ मा.रा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव